**जिल्हा परिषदेतंर्गत अर्धवेळ सफाई काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना विनाअट सेवेत सामावून घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
शासन परिपत्रक क्र. पदनि-१९०९/प्र.क्र. ३६२/आस्था १०,
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : २८ एप्रिल, २०११.

वाचा : १) शासन परिपत्रक, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्र. काव्यआ- ३३०५/प्रक्र-५४७/०५/ आस्था-१०, दिनांक ६-७-२००५.

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२००५/प्रक्र-४७/०५/१२, दिनांक २५-८-२००५.

**<u>शासन परिपत्रक</u>**

जिल्हा परिषदेतंर्गत अर्धवेळ सफाई काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना विनाअट सेवेत सामावून घेण्याबाबतची विनंती शासनास प्राप्त झाली आहे. असे कर्मचारी हे सादिल खर्चावर जिल्हा परिषदेमध्ये काम करीत असताना त्यांना सामावून घेण्याबाबत यापूर्वी वाचामध्ये नमूद केलेल्या शासन परिपत्रक क्र.काव्यआ-३३०५/प्रक्र-५४७/०५/आस्था-१०, दिनांक ६-७-२००५अन्वये असे कळविण्यात आले आहे की, महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा (सेवाप्रवेश) नियम १९६७ मधील तरतुदीनुसार विहित निकष पूर्ण करणाऱ्या व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सर्वसाधारण मार्गदर्शक तत्वानुसार पात्र ठरणाऱ्या अंशकालीन/अर्धवेळ सादिल खर्चावरील कर्मचाऱ्यांचा परिचर वर्ग-४ पदावरील नियुक्तीसाठी विचार करण्यात यावा. मात्र जे कर्मचारी या निकषानुसार परिचर वर्ग-४ पदावरील नियुक्तीसाठी पात्र ठरणार नाहीत, त्यांना नियमात कोणत्याही प्रकारे सूट देऊन परिचर वर्ग-४ पदावरील नियुक्तीसाठी त्यांचा विचार करण्यात येऊ नये.

२. याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २५-८-२००५ च्या स्वयंस्पष्ट शासन निर्णयात मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या उमरानी विरुध्द रजिस्ट्रार, तामीळनाडू या प्रकरणाच्या अनुषंगाने असे विहित केले आहे की, विहित नियमानुसार न केलेली भरती ही मागील दरवाजाने भरती ठरते. जिल्हा परिषदेमधील अशा कर्मचाऱ्यांना नियमित करता येणार नाही. महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम २५३ अन्वये कंत्राटी नेमणूका करण्याची तरतूद असून सविस्तर नियमही विहित केले आहेत. त्यानुसार अशा कंत्राटी कर्मचाऱ्यांना कायम करता येणार नाही अथवा नियमित पदाचे कोणतेही हक्क सांगता येणार नाहीत. याबाबत कर्नाटक राज्य आणि इतर विरुध्द जी. व्ही. चंद्रशेखर या प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक २५-२-२००९ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयावरुनही हे स्पष्ट होईल. तरी याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी त्याबाबत काटेकोर अंमलबजावणी करावी.

हे शासन परिपत्रक संगणक संकेतांक क्रमांक २०११०४१८१६२८०३००१ अन्वये www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( मोहम्मद हुसेन मुजावर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) विभागीय आयुक्त, सर्व विभाग.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
३) निवड नस्ती / कार्यासन -१०/ आस्था-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई - ३२.